**महाराष्ट्र साखर कारखाना कामगारांच्या मागण्यांवर विचार करण्यासाठी त्रिपक्षीय समितीने सादर केलेल्या अहवालावर कार्यवाही करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससाका - २०१६/प्र.क्र. २०९/काम-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १२/०१/२०१७.

**वाचा :** (१) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्र. संकीर्ण -२०१४/ प्र.क्र. ९६ / कामगार-३, दिनांक ८ जुलै,२०१५.
(२) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्र. संकीर्ण -२०१४/ प्र.क्र. ९६ / कामगार-३, दिनांक ०५ जानेवारी,२०१६
(३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्र. संकीर्ण -२०१४/ प्र.क्र. ९६ / कामगार-३, दिनांक ०५ मार्च ,२०१६
(४) कामगार उप आयुक्त,(औ.स.) मुंबई यांचे क्रमांक औसं /त्रिसास/२०१६/कार्या-८/२३४०, दिनांक ०३/०९/२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यातील साखर कारखाना कामगारांच्या मागण्यांवर विचार करण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक ८ जुलै.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये त्रिपक्षीय समिती स्थापन करण्यात आली आहे. तसेच , दिनांक ०५/०१/२०१६ व दिनांक ०५/०३/२०१६ च्या शासन निर्णयान्वये सदर समितीत खाजगी मालक प्रतिनिधी व कामगार प्रतिनिधीं यांचा सदस्य म्हणून सामावेश करण्यात आलेला आहे. सदर समितीस संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्यातील साखर कामगारांच्या मागण्यांवर शिफारसी सादर करण्याकरीता सहा महिन्यांची मुदतवाढही देण्यात आलेली आहे.

सदर समितीने महाराष्ट्र राज्यातील सर्व (सहकारी व खाजगी ) साखर कामगारांच्या मागण्यांबाबत वेळोवेळी बैठका घेऊन साखर उद्योगातील साखर कामगार /कर्मचा-यांचे वेतन, आजारी कारखाने, कर्मचा-यांचे थकीत वेतन इत्यादी साखर उद्योगाशी संबंधित घटकांशी चर्चा करून आपल्या शिफारशी तयार करून शासनास सादर केलेल्या आहेत.

उपरोक्त शिफारशींचे परिनिरीक्षण करून सदर शिफारशी व करारनाम्यास शासनाची मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्यातील साखर व उपपदार्थ उद्योगातील सहकारी, खाजगी,भाडेतत्वावर सहभागीदारी तत्वावर असणा-या सर्व कारखान्यांना या कराराच्या सेवाशर्तीची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील अशा त्रिपक्षिय समितीने शिफारसी केलेल्या आहेत. तसेच यासंदर्भात त्रिपक्षिय समितीने राज्यपातळीवर संबंधित मालक प्रतिनिधी व कामगार प्रतिनिधी यांचेसोबत वरील शिफारशीच्या अनुषंगाने दिनांक ०४/०७/२०१६ रोजी मुंबई येथे करार केलेला आहे.

वरील बाबी विचारात घेता त्रिपक्षिय समितीने शासनास सादर केलेल्या अहवालामध्ये नमुद केलेल्या सर्व शिफारशींच्या अनुषंगाने केलेल्या करारनाम्याची तात्काळ अंमलबजावणी करण्याबाबत या

निर्णयान्वये शासन मंजुरी देण्यात येत आहे. सदरहु करारनाम्यातील अटी व शर्ती सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये तपशिलवार दिलेल्या आहेत.

सदर त्रिपक्षिय समितीने केलेल्या शिफारशींनुसार करण्यात आलेल्या करारनाम्याची अंमलबजावणी करावयाचा कालावधी दिनांक ०१/०४/२०१४ ते दिनांक ०३/०३/२०१९ पर्यंत राहील. त्यांनतर उभयपक्षांकडून कायद्यातील तरतुदीनुसार करार रद्द करून , नवीन करार अस्तित्वात येईपर्यंत सदर करारनाम्यातील अटी व शर्तीची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी उभयपक्षावर बंधनकारक राहील.

सदरहु त्रिपक्षिय समितीच्या शिफारशींच्या अनुषंगाने दिनांक ०४/०७/२०१६ रोजी मुंबई येथे करण्यात आलेल्या कराराची अंमलबजावणी करण्यासंदर्भात **साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे** यांनी राज्यातील सर्व (सहकारी व खाजगी) साखर कारखान्यांना सूचना दयाव्यात व त्याबाबतचा अहवाल उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावा.

सदरहु शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८/२०१६, दिनांक ०३/११/२०१६ नुसार सहमतीने व मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०११३११५८४८३८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Varsha M Bharose

Digitally signed by Varsha M Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3e1fb27510d815dfa2ea1884eedb57e92914ff13c7358c095d3c03f9593e23d5, cn=Varsha M Bharose
Date: 2017.01.13 12:05:38 +05'30'

(व. मुं. भरोसे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

| | |
|---|---|
| १ | मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव |
| २ | मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव |
| ३ | मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव |
| ४ | मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव |
| ५ | मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव |
| ६ | मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई. |
| ७ | मा. प्रधान सचिव (कामगार ), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ८ | प्रधान सचिव (सहकार), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ९ | श्री. शिवाजीराव गिरधर पाटील, अध्यक्ष, महाराष्ट्र साखर कारखाना कामगार त्रिपक्षिय समिती, मुंबई ( उपाध्यक्ष, वसंतदादा साखर संशोधन संस्था, मांजरा (बुद्रुक), पुणे.) |
| १० | सहकार आयुक्त, महाराष्ट्र राज्य,पुणे, |
| ११ | साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| १२ | कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, बांद्रा-कुर्ला संकुल, वांद्रे(पूर्व), मुबई-४०० ०५१. |
| १३ | श्री.व्ही.के.बुवा, कामगार उप आयुक्त, (औ.सं.) मुंबई |
| १४ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ लि. साखर भवन, प्लॉट नं. २३०, ब्लॉक नं. ०३, बॅकबे रेक्लमेशन, नरिमन पॉईंट, मुंबई-४०००२१, |
| १५ | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साखर कामगार प्रतिनिधी मंडळ, पुणे. |

| | |
|---|---|
| १६ | अध्यक्ष, साखर कामगार महासंघ, मु.पो. साक्री, जिल्हा धुळे. |
| १७ | श्री.पोपटराव सदाशिव मिटकरी, खाजगी साखर कारखाना कामगार प्रतिनिधी तथा अध्यक्ष, मालेगाव तालुका राष्ट्रीय शुगर वर्कर्स युनियन, रावळगाव, ता.मालेगाव, जि.नाशिक. |
| १८ | उप सचिव(प्रशा-१), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. |
| १९ | उप सचिव (काम- ८), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. |
| २० | उप सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. |
| २१ | महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई. |
| २२ | महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य- २ नागपूर. |
| २३ | महालेखापाल(लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई. |
| २४ | महालेखापाल(लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर. |
| २५ | संचालक, लेखा व कोषागार, मुंबई |
| २६ | अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई. |
| २७ | निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई |
| २८ | वित्त विभाग, (व्यय व अर्थसकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई. |
| २९ | विरोधी पक्षनेता, विधान सभा /विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन मुंबई |
| ३० | प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन, मुंबई . |
| ३१ | निवड नस्ती (काम-३). |

## प्रपत्र -अ

## महाराष्ट्र साखर कारखाना कामगारांच्या मागण्यांवर विचार करण्यासाठी त्रिपक्षीय समितीने सादर केलेल्या अहवालावर कार्यवाही करण्याबाबत.

शासन निर्णय, क्रमांक : ससाका -२०१६/प्र.क्र. २०९ /काम-३
उद्योग, उर्जा व कामगार विभाग
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - १२/१/२०१७.

त्रिपक्षिय समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने त्रिपक्षिय समिती, मालक प्रतिनिधी व कामगार प्रतिनिधी यांनी दिनांक ४.७.२०१६ रोजी मुंबई येथे केलेल्या करारातील अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत. :-

१) **कराराची व्याप्ती -**

हा करार महाराष्ट्रातील साखर व उपपदार्थ उदयोगातील दि ०१/०४/२०१४ व त्यानंतर हजेरी पत्रकावर असलेल्या सर्व कायम, हंगामी कायम व हंगामी (ऑर्डर काढलेले ) कामगारांना लागु राहील. त्याव्यतिरिक्त नियमित खात्यामध्ये काम करणारे रोजंदारीवरील, कारखान्याच्या मस्टरवरील व प्लँटवरील काम करणारे कामगार समाविष्ठ असतील. महाराष्ट्र शासनातर्फे निश्चित होणा-या आकृतीबंधाच्या कारखाना निहाय जागांबाबतची आकडेवारी स्थानिक पातळीवरील प्रातिनिधीक संघटना व कारखाना व्यवस्थापन यांनी एकत्रपणे निश्चित करावी. मात्र आकृतीबंध समितीचा निर्णय होईपर्यंत या त्रिपक्षीय कराराची अमलबजावणी थांबवु नये. ३ वर्ष पूर्ण सेवा करणा-या कामगारांना त्या त्या वेळी या कराराचा लाभ मिळेल असे उभयपक्षी मान्य करण्यात येत आहे.

२) **मुळ पगारात वाढ-**

या करारानुसार दिनांक ०१/०४/२०१४ रोजी हजेरी पत्रकावर वेतनश्रेणीत पगार घेत असलेल्या सर्व कायम, हंगामी कायम (ऑर्डर काढलेल्या ) कामगारांना अस्तित्वात असलेल्या मुळ पगार, महागाई भत्ता, स्थिर भत्ता मिळवुन १५ % पगार वाढ देण्यात येईल. या व्यतिरिक्त करार व्याप्ती कलम क्र.१ नुसार नव्याने समाविष्ठ झालेल्या कामगारांना कराराने होणारे किमान वेतन व वेतन श्रेणी देण्यात यावी.

पगार वाढीत दिनांक ०१/०४/२०१४ रोजी संबंधित कामगार/ कर्मचा-यांच्या वेतन श्रेणीत १५% पगार वाढ म्हणजेच अस्तित्वात असलेल्या पगाराच्या १५ % पगार वाढ देण्यात येईल. या पगार वाढीत धुलाई भत्ता ,घरभाडे भत्ता ,वैदयकीय भत्ता ,महागाई भत्ता इ. वाढीचा समावेश राहील हे उभयपक्षी मान्य करण्यात येत आहे.

| अ.क्र | वर्गवारी | निर्धारीत वाढ रुपये |
|---|---|---|
| १ | अकुशल | १९९५ |
| २ | निमकुशल | २०१३ |
| ३ | कुशल-ब | २०६० |
| ४ | कुशल-अ | २०७८ |
| ५ | अतिकुशल | २११९ |
| ६ | क्लार्क-४ | २०६० |

| | | |
|---|---|---|
| ७ | क्लार्क-३ | २०७८ |
| ८ | क्लार्क-२ | २१२० |
| ९ | क्लार्क-१ | २१४० |
| १० | सुपरवायझर-सी | २१४० |
| ११ | सुपरवायझर-बी | २१८५ |
| १२ | सुपरवायझर-अे | २२३४ |

याशिवाय गरजेनुसार फिटमेंट बेनिफिट देण्यात येईल.

३) **वर्गवारी व वेतनश्रेणी -:**

तृतीय वेतन मंडळाने सूचविलेली वर्गवारी व वेतन श्रेणी आणि स्थिर भत्ता यापूर्वीच्याच करारानुसार स्विकारण्यात आल्या आहेत. दिनांक ०१/०४/२०१४ पासूनच्या सुधारीत वेतनश्रेण्या परिशिष्ट - अ प्रमाणे असून स्थिर भत्ता पुर्ण रूपयात करून घेतलेला आहे. अखिल भारतीय सरासरी ग्राहक निर्देशांक १९६० = १०० चा पाया धरून दिनांक ०१/०४/२०१४ रोजी निर्देशांक ५४७१ साठी असणा-या महागाई भत्त्याची रक्कम रू. ५१९८.७० ही मुळ वेतनात समाविष्ट करण्यात यावी. व एप्रिलचा महागाई भत्ता ६२.१० असा राहील.

४) **मुळ वेतन निश्चिती :-**

कर्मचा-यांचे दिनांक १ एप्रिल,२०१४ रोजीच्या अस्तित्वात असलेल्या मुळ पगारात प्रथम दिनांक ३१/०३/२०१४ रोजीचा एकुण महागाई भत्ता रू. ५१९८.७० हा मिळविण्यात यावा.

ब) कलम २ मध्ये नमुद केलेली मुळ पगारातील वाढ त्या त्या कामगारांच्या अस्तित्वात असलेल्या पगाराप्रमाणे त्यांच्यावरील वाढीत समाविष्ट करून सुधारित मुळ वेतन दिनांक १ एप्रिल,२०१४ पासून निश्चित करण्यात यावे.

क) वरील अ व ब प्रमाणे कर्मचा-यांचे सुधारित मुळ वेतन त्यात लागु असलेल्या वेतन श्रेणीच्या योग्य टप्प्यावर येत नसेल तर ते नजिकच्या वरच्या टप्प्यावर निश्चित करण्यात येईल. व त्यासाठी कमी पडत असलेली रक्कम फिटमेंट बेनिफिट म्हणून संबंधितांस अदा करण्यात यावी. उदा. अकुशल कामगारांचे वेतन निश्चिती परिशिष्ट - ब प्रमाणे राहील.

ड) दिनांक ०१/०४/२०१४ पासून महागाई भत्त्याचे दर ५४७१ अंशाच्या वाढीव अगर कमी झालेल्या प्रति अंशास रूपये २.७० असा दर राहील. ( मुळ वेतन निश्चिती व दिनांक ०१/०४/२०१४ रोजीचा सुधारित दराने होणारा पगार परिशिष्ट - ब प्रमाणे आहे.)

५) **नोकरीच्या कालावधीमध्ये पगारवाढ देण्याबाबत:-**

पात्र कर्मचा-यांना त्यांच्या नोकरीच्या कालावधीप्रमाणे खालीलप्रमाणे जादा वेतनवाढी दिनांक ०१/०४/२०१४ रोजी देण्यात येतील.

अ) दिनांक ०१/०४/२०१४ रोजी ७ वर्षे नोकरीपुर्ण झालेल्या कामगार/ कर्मचा-यांना नविन वेतनश्रेणीतील एक जादा वेतनवाढ देण्यात येईल.

ब) दिनांक ०१/०४/२०१४ रोजी १५ वर्षे नोकरीपुर्ण झालेल्या कामगार/ कर्मचा-यांना नविन वेतनश्रेणीतील दोन जादा वेतनवाढ देण्यात येईल.

क) दिनांक ०१/०४/२०१४ रोजी २२ वर्षे नोकरीपुर्ण झालेल्या कामगार/ कर्मचा-यांना नविन वेतनश्रेणीतील तीन जादा वेतनवाढ देण्यात येईल.

वरील जादा वेतनवाढीचा लाभ वर नमुद केलेल्या कामगार/ कर्मचा-यांना दिनांक ०१/०४/२०१४ ला एकदाच मिळेल असे उभयपक्षी मान्य करण्यात आले.

**६) महागाई भत्ता :-** अखिल भारतीय ग्राहक निर्देशांक ( १९६०=१०० ) पायाभूत मानून प्रचलित करारानुसार महागाई भत्ता देण्यात येत आहे. दिनांक ०१/०४/२०१४ पासून ५४७१ अंशाच्या वाढीव किंवा कमी झालेल्या प्रती अंशास रूपये २.७० असा दर राहील.

**७) रिटेन्शन अलाऊंस :-** प्रचलित पध्दतीनुसार कामगार/ कर्मचा-यांना बिगर हंगाम कालावधीकरीता खाली नमूद केल्याप्रमाणे रिटेन्शन अलाऊंस दिनांक १/०४/२०१४ पासून देण्यात येईल. तथापि, सदरच्या प्रचलित पध्दतीबाबत कामगार / कामगार संघटनांनी वाद उपस्थित करू नये.

| अ.क्र | वर्गवारी | दर टक्के |
|---|---|---|
| १ | अकुशल | ३२ |
| २ | निमकुशल | ४२ |
| ३ | कुशल-अ | ५२ |
| ४ | कुशल-ब | |
| ५ | अतिकुशल | |
| ६ | क्लार्क-१,२,३,४ | |
| ७ | सुपरवायझर- अे,बी,सी, | |

**८) घरभाडे भत्ता :-**

महाराष्ट्र कामगार किमान घरभाडे भत्ता अधिनियम,१९८३ च्या तरतुदीनुसार किमान ५ टक्के घरभाडे भत्ता देण्यात यावा असे उभयपक्षी मान्य करण्यात आले. मात्र ज्या कर्मचा-यांना कारखान्यामार्फत घरे देण्यात आली असतील ते कर्मचारी कायद्यातील तरतुदीनुसार घरभाडे भत्ता मिळण्यास पात्र राहणार नाहीत.

**९) रात्रपाळी भत्ता :-**

दिनांक ०१/०४/२०१४ पासून रात्रपाळी (तिसरीपाळी ) काम करणा-यांना/ हजर असलेल्या प्रत्येक रात्रपाळीसाठी रू. २३.०० प्रमाणे रात्रपाळी भत्ता प्रचलित पध्दतीनुसार देण्यात येईल.

**१०) धुलाई भत्ता :-**

दिनांक ०१/०४/२०१४ पासून सर्व ग्रेडमधील कर्मचा-यांना खालीलप्रमाणे ग्रेडनुसार दरमहा धुलाई भत्ता देण्यात येईल.

| अ.क्र | वर्गवारी | धुलाई भत्ता रूपये |
|---|---|---|
| १ | अकुशल | १४९.०० |
| २ | निमकुशल | १५७.०० |
| ३ | कुशल-ब | २३४.०० |
| ४ | कुशल-अ | १८४.०० |
| ५ | अतिकुशल | २६५.०० |
| ६ | कारकुन -४ | २३४.०० |
| ७ | कारकुन -३ | १८४.०० |
| ८ | कारकुन -२ | २७०.०० |
| ९ | कारकुन -१ | १९०.०० |

| | | |
|---|---|---|
| १० | सुपरवायझर- सी | १८६.०० |
| ११ | सुपरवायझर- बी | २८३.०० |
| १२ | सुपरवायझर- अे | १८२.०० |

**११) वैद्याकिय भत्ता :-**

दिनांक ०१/०४/२०१४ पासून सर्व कर्मचा-यांना दरमहा रूपये २७५/- प्रमाणे वैद्यकीय भत्ता देण्यात येईल.

**१२) वेटेज :-** सदर मागणीबाबत उभयपक्षी चर्चा होवून दिनांक ०१/०४/२०१४ पासून वेटेजचे दर खालीलप्रमाणे एकमताने ठरविण्यात आले.

| अ.क्र | हुद्दा | दरमहा दर रूपये |
|---|---|---|
| १ | पल्लेदार / हमाल | ७९.०० |
| २ | गेस्टहाऊस अटेंडन्ट | ५१.०० |
| ३ | सेन्ट्रीफ्युगल मजूर<br>( हायस्पिड ॲटोमेटिक सेट्रीफ्युगल ऑपरेटर व्यक्तीगत काम करणारे सेट्रीफ्युगल मजूर ) | ५१.०० |
| ४ | शिपाई/ स्विपर/वॉचमन/क्लीनर्स | ५१.०० |

**१३) स्त्री कामगारांना बाळंतपणाबाबतच्या रजेबाबत :-**

स्त्री कामगारांना बाळंतपणासाठी मॅटर्निटी बेनिफिट अधिनियमानुसार रजा देण्यात येईल.

**१४ ) कर्मचा-यांच्या मुलांना / वारसांना कामावर घेण्याबाबत:-**

कामगार/कर्मचारी कामावर असताना अपघात होवून तो मयत झाल्यास, कायम अपंगत्व आल्यास त्या कुटुंबातील आई / वडील/मुलगा/मलगी/पती/पत्नी यापैकी एक वारसास अनुकंपा तत्वावर पात्र असल्यास पात्रतेप्रमाणे कामावर घेण्यात यावे असे उभयपक्षी मान्य करण्यात आले. तथापि, त्या वारसाचे वय १८ वर्षापेक्षा कमी नसावे व ४५ वर्षापेक्षा जास्त नसावे.

**१५) मयत/ सेवा निवृत्त कर्मचा-यांना कराराचे फायदे मिळण्याबाबत.**

दिनांक ०१/०४/२०१४ वा त्यानंतर सेवा निवृत्त वा राजीनामा दिलेले ( स्वेच्छा निवृती वगळून ) व मयत झालेल्या कर्मचा-यांचे कायदेशीर वारसांना या करारामुळे होणारे आर्थिक फायदे देण्यात येतील.

**१६) फरकाची रक्कम :-**

या करारान्वये कामगारांना दिनांक ०१/०७/२०१५ पासून फरकाची रक्कम अदा करण्यात यावी असे उभयपक्षी मान्य करण्यात आले. सदर करारामुळे अदा करावयाची फरक रक्कम कारखान्याची कराराची मुदत संपण्यापुर्वी किंवा दिनांक ३१/०३/२०१७ पुर्वी देण्यात यावी.

या कराराच्या कालावधीमध्ये कर्मचा-यांना पगार वाढीबाबत करारात समाविष्ट असलेली कोणतीही मागणी दिनांक २७/०२/२०१४ महाराष्ट्र राज्य साखर कामगार प्रतिनिधी मंडळ आणि दिनांक ०९/०५/२०१४ साखर कारखाना महासंघ व दिनांक ०५/४/२०१४ कामगार फेडरेशन इंटक अन्वये नोटीसी सोबत जोडलेल्या तीन्हीही संघटनांच्या मागणीपत्रकापैकी मान्य न झालेल्या मागण्या व ज्यामुळे व्यवस्थापनावर जादा आर्थिक बोजा वाढेल अशी कोणती नवीन मागणी ( बोनस वगळुन) कर्मचा-यांकडुन किंवा कर्मचारी संघटनाकडुन उपस्थित केली जाणार नाही असे उभयपक्षी मान्य करण्यात येत आहे.

१७) **<u>रजा व पगारी सुटटया-</u>**

रजा व पगारी सुटटया स्थानिक पातळीवर प्रचलित पध्दतीनुसार देण्यात याव्यात.

१८) **<u>गणवेश-</u>**

स्थानिक पातळीवर प्रचलित पध्दतीनुसार गणवेश देण्यात यावा.

१९) **<u>प्रवास भत्ता -</u>**

स्थानिक पातळीवर प्रचलित पध्दतीनुसार प्रवास भत्ता देण्यात यावा.

२०) **<u>शेती विभाग व वाहन भत्ता -</u>**

स्थानिक पातळीवर प्रचलित पध्दतीनुसार वाहन भत्ता व दैनिक भत्ता देण्यात यावा.

२१) **<u>सवलतीच्या दराने दरमहा साखर देण्यांबाबत-</u>**

स्थानिक पातळीवर प्रचलित पध्दतीनुसार व साखर आयुक्तांच्या व केंद्र शासनाच्या आदेशानुसार साखर देण्याचे उभयपक्षी मान्य करण्यात आले.

२२) **<u>जुन्या सवलती चालू ठेवण्याबाबत -</u>**

या करारामुळे कामगार / कर्मचा-यांच्या सद्याच्या सेवा शर्तीवर कोणताही विपरीत परिणाम होणार नाही व त्या पुढे चालू राहतील.

२३) **<u>अपघातात खास पगारी रजा व अपघातातील खर्च देणेबाबत-</u>**

वर्कमन, कॉम्पेनशेसन ॲक्ट १२३ प्रमाणे कर्मचा-यांना लागू असणा-या सोयी सवलती देण्यात याव्यात.

२४) **<u>रात्रपाळी, पहाटपाळीत येणा-या कामगारांसाठी विश्रामगृह सवलती देण्याबाबत-</u>**

कर्मचा-यांना कारखान्याच्या विश्रामगृह सवलती देण्यात येतील.

२५) **<u>कारखान्यातील दवाखान्याची व कायमस्वरुपी वैदयकीय अधिकारी नेमण्याची सोय-</u>**

कामगार / कर्मचारी कारखान्याच्या १३जानेवारी १९९० मधील कराराच्या शब्दांकानुसार वैदयकीय सवलती देण्यात येतील. तसेच आजारपणाच्या गंभीर रोगामध्ये १) कॅन्सर २) हदयविकार (हॉर्टअटॅक) ३) अर्धांगवायू (पॅरालिसिस) ४) कुष्ठरोग ५) एडस या रोगांचा समावेश असेल असे उभयपक्षी मान्य करण्यात आले.

२६) **<u>ग्रुप ग्रॅच्युईटी विमा योजना लागु करणे -</u>**

स्थानिक पातळीवर निर्णय घेण्यात यावा.

२७) **<u>उत्पादन वाढीसाठी सहकार्य</u>**

कामगार / कर्मचारी अधिक कार्यक्षमता वापरुन जास्तीत जास्त उत्पादन वाढविण्यासाठी व्यवस्थापनाला सहकार्य करतील. त्याचप्रमाणे औदयोगिक शांतता कायम राहण्यास कर्मचारी संघटना या व्यवस्थापनास जास्तीत जास्त सहकार्य करतील.

२८) **<u>संप, घेराव, अनुचित कर्मचारी प्रथा -</u>**

कराराच्या कालावधीमध्ये कामगार / कर्मचारी संघटना कोणत्याही प्रकारचा संप, घेराव, अनुचित प्रथा किंवा दबाव तंत्राचा वापर करणार नाहीत.

या करारावर स्वाक्षरी करणा-या संघटनांचे पदाधिकारी / सदस्य व या कराराचे आर्थिक फायदे घेणारे कामगार/कर्मचारी यावर हा करार बधंनकारक राहील.

२९) **<u>कामगार संघटना व फेडरेशनला फरकातुन दयावयाचा निधी-</u>**

या कराराद्वारे साखर कामगारांना आर्थिक लाभ होणार आहे. त्यामुळे यासाठी झालेल्या खर्चाची भरपाई होण्याच्या दष्टीने कामगारांना मिळणा-या फरकाच्या एकुण रक्कमेतुन शेकडा १० % प्रमाणे

रक्कम कारखान्याने कपात करुन त्यापैकी संबंधित स्थानिक प्रातिनिधिक व मान्यता प्राप्त कामगार संघटनेला ५% व ही मान्यता प्राप्त संघटना ज्या राज्यव्यापी (**फेडरेशनला**) महाराष्ट्र राज्य साखर कामगार प्रतिनिधी मंडळ किंवा महाराष्ट्र राज्य साखर कामगार महासंघ किंवा महाराष्ट्र राज्य राष्ट्रीय साखर कामगार फेडरेशन संलग्न असेल त्या फेडरेशनला ५% रक्कम देण्याचे मान्य करण्यात येत आहे. तथापि ५ टक्के राज्य पातळीवरील संघटनेची रक्क्म कारखान्याने परस्पर पाठविण्याची जबाबदारी राहील.

३०) **उर्वरीत मागण्या-**

या करारामध्ये युनियनच्या मागणीपत्रकातील किंवा अन्य मागण्यांचा स्पष्टपणे स्विकार केलेला नाही किंवा तत्संबंधी या करारात कोणतीही तरतुद करण्यात आलेली नाही. अशा मागण्या पुर्णत: वगळण्यात आलेल्या आहेत असे उभयपक्षी मान्य केलेले आहे.

३१) **कारखाना पातळीवर करार -**

हा करार राज्य पातळीवर केलेला असुन साखर कारखाना पातळीवर प्रत्येक साखर कारखाना व प्रातिनिधिक /मान्यता प्राप्त संघटना प्रचलित आणि संबंधित कायदयानुसार करार करतील.

या करारामुळे कामगार / कर्मचा-यांच्या सेवा शर्तीवर कोणताही विपरीत परिणाम होणार नाही.

३२) **कराराची मुदत -**

कराराची मूदत दिनांक ०१/०४/२०१४ पासुन ते दिनांक ३१/०३/२०१९ पर्यंत राहिल. त्यानुसार हा करार उभयपक्षावर बंधनकारक राहील. त्यानंतर उभयपक्षांकडुन कायदयातील तरतुदीनुसार करार रद्द करुन नवीन करार अस्तित्वात येईपर्यंत सदर करार उभयपक्षांवर बंधंनकारक राहील.

३३) **अंतरीम वाढ-**

आदेशाप्रमाणे देण्यात आलेली रुपये ९००/- अंतरीम पगारवाढ फरक रक्कमेतुन वसुल करण्यात यावी.

३४) **शिफारशींच्या आधारावर करार करण्याबाबत.**

उपरोक्त शिफारशी महाराष्ट्र राज्यातील साखर व उपपदार्थ उद्योगातील कलम क्रमांक १ मध्ये नमूद असलेल्या कामगार /कर्मचा-यांना लागु राहील अशी हि समिती एकमताने शिफारस करीत आहे.

उपरोक्त सर्व शिफारशींवर आधारीत उभयपक्षाने राज्य पातळीवर करार करावा व त्या धर्तीवर प्रत्यक साखर कारखाना पातळीवर, प्रत्येक साखर कारखाना व प्रातिनिधिक / मान्यताप्राप्त कर्मचारी संघटना यांच्यात प्रचलित आणि संबंधित कायदयानुसार करार करावेत. या करारामुळे कामगारांच्या सध्याच्या सेवाशर्तीवर कोणताही विपरित परिणाम होणार नाही हे ही पहावे. कारखान्याच्या व्यवस्थापनाने तसेच होणा-या करारावर स्वाक्षरी करणा-या कामगार संघटनांचे पदाधिकारी / सदस्य व करारामुळे आर्थिक फायदे घेणार असलेले कामगार यांचेवर या कराराच्या सेवाशर्ती बंधनकारक राहतील.

## परिशिष्ट-अ

## तृतीय वेतन मंडळाने सूचविलेली वर्गवारी, वेतनश्रेणी व स्थिरभत्ता

(दिनांक ०१ एप्रिल,२०१४ पासून अंमलात)

| वर्गवारी | सध्याची वेतनश्रेणी | स्थिर भत्ता | सुधारीत वेतनश्रेणी | स्थिर भत्ता |
|---|---|---|---|---|
| अकुशल | ६८००-७५-७५५०-८०-८३५०-८५-९६२५ | ३०५ | १३६००-१०५-१४६५०-११०-१५७५०-११५- १६९०० | ३०५ |
| निमकुशल | ७०००-८० -७८००-८५-८६५०- ९०- १०००० | २२१ | १३८००-११०-१४९००-११५-१६०५०-१२०- १७२५० | २२१ |
| कुशल-ब | ७३००-९० -८२००-९५-९१५०- १००- १०६५० | १०३ | १४१००-१२०-१५३००-१२५-१६५५०-१३०-१७८५० | १०३ |
| कुशल-अ | ७६००-९५-८५५०-१००-९५५०-१०५-११९२५ | ५ | १४४००-१२५-१५६५०-१३०-१६९५०-१३५-१८३०० | ५ |
| अतिकुशल | ७८००-१००-८८००-१०५-९८५०-११०-११५०० | - | १४६००-१३०-१५९००-१३५-१७२५०-१४०-१८३०० | - |
| क्लार्क-४ | ७३००-९०-८२००-९५-९१५०-१००-१०६५० | १०१ | १४१००-१२०-१५३००-१२५-१६५५०-१३०-१७८५० | १०१ |
| क्लार्क-३ | ७६००-९५-८५५०-१००-९५५०-१०५-११९२५ | - | १४४००-१२५-१५४५०-१३०-१६९५०-१३५-१८३०० | - |
| क्लार्क-२ | ७८००-१००-८८००-१०५-९८५०-११०-११५०० | - | १४६००-१३०-१५९००-१३५-१७२५०-१४०-१८६५० | - |
| क्लार्क-१ | ८०००-१०५-९०५०-११०-१०१५०-११५-११८७५ | - | १४८००-१३५-१६१५०-१४०-१७५५०-१४५-१९००० | - |
| सुपरवायझर-सी | ८०००-१०५-९०५०-११०-१०१५०-११५-११८७५ | - | १४८००-१३५-१६१५०-१४०-१७५५०-१४५-१९००० | - |
| सुपरवायझर-बी | ८२००-११०-९३००-११५-१०४५०-१२०-१२२५० | - | १५०००-१४०-१६४००-१४५-१७८५०-१५०-१९३५० | - |
| सुपरवायझर-अे | ८६००-१२५-९८५०-१४०-११२५०-१५५-१३५७५ | - | १५४००-१५५-१६९५०-१७०-१८६५०-१८५-२०५०० | - |

## परिशिष्ट - ब
## मुळ पगार निश्चिती व नविन पगार

**<u>ग्रेड -अकुशल</u>**

**सध्याची वेतनश्रेणी** ६८००-७५-७५५०-८०-८३५०-८५-९६२५

**नविन वेतनश्रेणी** १३६००-१०५-१४६५०-११०-१५७५०-११५-१६९००

| अ.क्र. | तपशिल | ०१/०३/२०१४ जुनापगार | १/०४/२०१४ चा नविन पगार | झालेली पगार वाढ रूपये |
|---|---|---|---|---|
| १ | मुळ पगार | ६८०० | १३९५० | |
| २ | महागाई भत्ता | ५१९८.७० | ६२.१० | |
| ३ | स्थिर भत्ता | ३०५.०० | ३०५.०० | |
| | एकुण | १२३०३.७० | १४२८२.१० | १९७८.४० |
| ४ | घरभाडे भत्ता ५% | ६१५.१८ | ७१४.११ | ९८.९२ |
| ५ | वैद्यकीय भत्ता | २४५.०० | २७४.०० | २९.०० |
| ६ | धुलाई भत्ता | १३३.०० | १४९.०० | १६.०० |
| | एकुण | १३२९६.८८ | १५४१९.२१ | २१२२.३२ |

दिनांक १/०४/२०१४ चा पगार - रूपये १३२९६.८९
दिनांक ०१/०४/२०१४ पासून केलेली वाढ - रूपये २१२२.३२
दिनांक १/०४/२०१४ रोजी होणारा पगार - रूपये १५४१९.२१

| | | | | |
|---|---|---|---|---|
| फिटमेंट | मुळ पगार | रूपये | ६८००.०० | |
| न्युट्रलाईज डिए. | | रूपये | ५१९८.७०+३०५.०० = १२३०३.७० | |
| वाढ १५% | | रूपये | १८४५.५५ | १३८४४.२५ |
| फिटमेंट बेनिफिट | | रूपये | ७०.७५ | |
| एकुण नविन मुळ पगार | | रूपये | १३९१५.०० | |